20110721155856001

RNI No. MAHBIL/2009/35530



# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग चार

वर्ष ३, अंक १६)] सोमवार, जुलै ४, २०११/आषाढ १३, शके १९३३ [ पृष्ठे ६, किंमत रुपये २०.००

असाधारण क्रमांक ४९

प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.

अनुक्रमणिका



**नगर विकास विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ४ जुलै २०११.

## MAHARASHTRA ORDINANCE No. XVII OF 2011.

AN ORDINANCE

FURTHER TO AMEND THE NAGPUR IMPROVEMENT TRUST ACT, 1936.

**सन २०११ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १७.**

**नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम, १९३६ यात आणखी सुधारणा करण्यासाठी अध्यादेश.**

**ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही ;

१९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड ३६.

**आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम, १९३६ यात आणखी सुधारणा करण्यासाठी महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे ;

**त्याअर्थी, आता,** भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २१३ च्या खंड (१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, पुढील अध्यादेश प्रख्यापित करीत आहेत :—

संक्षिप्त नाव व प्रारंभ.

१. (१) या अध्यादेशास, नागपूर सुधार प्रन्यास (सुधारणा) अध्यादेश, २०११ असे म्हणावे.

(२) तो, तात्काळ अंमलात येईल.

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ याच्या कलम ४ ची सुधारणा.

२. नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम, १९३६ (यात यापुढे ज्याचा निर्देश " मुख्य अधिनियम " असा करण्यात आला आहे), याच्या कलम ४ मधील,— १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड ३६.

(१) पोट-कलम (१) मध्ये,—

(क) " नऊ विश्वस्तांचा " या मजकुराऐवजी " दहा विश्वस्तांचा " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) खंड (ख) नंतर, पुढील खंड समाविष्ट करण्यात येईल :—

" (खक) राज्य शासनाने नामनिर्दिष्ट केलेला नागपूर जिल्ह्याचा जिल्हाधिकारी किंवा अपर जिल्हाधिकारी ; " ;

(२) पोट-कलम (३) मधील, " किंवा खंड (ग) " या मजकुराऐवजी " खंड (खक) किंवा खंड (ग) " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ याच्या कलम ७ ची सुधारणा.

३. मुख्य अधिनियमाच्या कलम ७ मधील, पोट-कलम (१) मध्ये, " किंवा खंड (ग) " या मजकुराऐवजी " खंड (खक) किंवा खंड (ग) " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ याच्या कलम २१-क ची सुधारणा.

४. मुख्य अधिनियमाच्या कलम २१-क मधील, पोट-कलम (२) मधील परंतुक वगळण्यात येईल.

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ याच्या कलम २२ ची सुधारणा.

५. मुख्य अधिनियमाच्या कलम २२ ला त्याचे पोट-कलम (१) असा नवीन क्रमांक देण्यात येईल ; आणि

(१) असा नवीन क्रमांक दिलेल्या पोट-कलम (१) मधील,—

(क) खंड (क) मध्ये " ज्यांचे मासिक वेतन दिडशे रुपयांहून अधिक नसेल " या मजकुराऐवजी " ज्यांचे वेतन संरचनेतील श्रेणी वेतन सहायक अभियंत्याला देय असलेल्या श्रेणी वेतनाएवढे किंवा कमी असेल " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) परंतुकातील " पन्नास रुपयांपेक्षा अधिक मासिक वेतन मिळविणारा " या मजकुराऐवजी " सहायक अभियंत्याला देय असलेल्या वेतन संरचनेतील श्रेणी वेतनापेक्षा कमी श्रेणी वेतन घेणारा " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) अशा नवीन क्रमांक दिलेल्या पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलम दाखल करण्यात येईल :—

" (२) या कलमात काहीही अंतर्भूत असले तरी, राज्य शासनाने त्याच्या सेवेतील कोणताही अधिकारी, आदेशाद्वारे प्रन्यासच्या आस्थापनेवर नियुक्ती करण्यासाठी प्रतिनियुक्त करणे हे विधिसंमत असेल आणि असा आदेश प्राप्त झाल्यावर, प्रन्यास तशी नियुक्ती करील. अशा प्रतिनियुक्त अधिकाऱ्याच्या सेवेच्या अटी व शर्ती आणि नियुक्तीचा कालावधी राज्य शासनाने आदेशात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे असेल.".

६. मुख्य अधिनियमाच्या कलम २४ मधील " आणि तसेच अध्यक्षाच्या नियंत्रणाच्या व पुनरीक्षणाच्या " या मजकुराऐवजी " आणि तसेच अध्यक्षांच्या नियंत्रणाच्या व स्वाधिकारे पुनरीक्षणाच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ याच्या कलम २४ ची सुधारणा.

७. मुख्य अधिनियमाच्या कलम २४-ग नंतर, पुढील कलमे समाविष्ट करण्यात येतील :—

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ यामध्ये कलमे २४-घ आणि २४-ङ. समाविष्ट करणे.

" **२४-घ**. राज्य शासन, प्रन्यासच्या आर्थिक बाबींसंबंधी, कामकाज चालविण्याबाबत आणि कारभाराबाबत वेळोवेळी त्याला योग्य वाटतील असे निदेश किंवा सूचना देईल आणि अशा निदेशांचे किंवा सूचनांचे अनुपालन करणे आणि त्यानुसार कृती करणे प्रन्यासला बंधनकारक असेल :

निदेश अथवा सूचना देण्याचा राज्य शासनाचा अधिकार.

परंतु, राज्य शासन, असे निदेश किंवा सूचना देण्यापूर्वी, असे निदेश किंवा सूचना का देण्यात येऊ नयेत याबाबत पंधरा दिवसांच्या आत निवेदन सादर करण्याची प्रन्यासला संधी देईल. जर प्रन्यासने, पंधरा दिवसांच्या आत निवेदन सादर करण्यात कसूर केली तर किंवा निवेदन सादर केल्यानंतर आणि राज्य शासनाने ते विचारात घेतल्यानंतर असे निदेश किंवा सूचना देणे आवश्यक आहे असे राज्य शासनाचे मत असेल तर; राज्य शासन, अशा सूचना किंवा निदेश देईल.

**२४-ङ**. (१) राज्य शासनाने, अध्यक्षाने त्याच्याकडे केलेल्या निर्देशानुसार किंवा स्वतःहून, प्रन्यासचा किंवा त्याच्या प्राधिकाऱ्यांचा अथवा अधिकाऱ्यांचा कोणताही निर्णय, आदेश अथवा कोणतीही कृती हा अधिनियम किंवा त्या त्या वेळी अंमलात असलेला कोणताही कायदा किंवा त्याखाली केलेले कोणतेही नियम, विनियम अथवा उपविधि, याद्वारे किंवा तदन्वये दिलेल्या अधिकारांचा अवाजवी वापर करणारी किंवा त्यांचे उल्लंघन करणारी आहे ; किंवा प्रन्यासच्या निधीचा दुरुपयोग अथवा गैरवापर किंवा अपव्यय करणारा आहे किंवा प्रन्यासच्या वित्तीय हिताच्या विरुद्ध आहे किंवा जनहिताच्या विरुद्ध आहे किंवा राज्य शासनाच्या धोरणाच्या विरुद्ध आहे याबाबत राज्य शासनाची खात्री पटली तर, राज्य शासन, त्याबाबत यथायोग्य लेखी आदेश देईल. अशा आदेशाची एक प्रत, राज्य शासन, ताबडतोब अध्यक्षाला पाठवील :

प्रन्यासचा कोणताही निर्णय, इत्यादीस स्थगिती देण्याचा राज्य शासनाचा अधिकार.

परंतु, राज्य शासन, कोणताही असा आदेश देण्यापूर्वी, असा आदेश का देण्यात येऊ नये याबद्दल पंधरा दिवसांच्या आत निवेदन करण्याची संधी प्रन्यासला देईल. जर प्रन्यासने पंधरा दिवसांच्या आत निवेदन सादर करण्यात कसूर केली तर किंवा निवेदन सादर केल्यानंतर आणि राज्य शासनाने ते विचारात घेतल्यानंतर असा आदेश देणे आवश्यक आहे, असे राज्य शासनाचे मत असेल तर राज्य शासन, असा आदेश देईल.

(२) पोट-कलम (१) खालील पाठवलेला आदेश मिळाल्यावर प्रन्यास, त्या आदेशाचे पालन करण्यास व त्यानुसार कार्य करण्यास बांधील असेल.

(३) जो कोणताही निर्णय, आदेश किंवा कृती याबाबत अध्यक्षाने पोट-कलम (१) अनुसार निर्देश केला असेल किंवा उक्त पोट-कलमान्वये स्वत:हून दखल घेतली असेल असा निर्णय, आदेश किंवा कृती यांची, पोट-कलम (१) अनुसार राज्य शासनाचा निर्णय प्रन्यासला कळविला जाईल तोपर्यंत, प्रन्यास किंवा त्याचा कोणताही प्राधिकारी अथवा अधिकारी, अंमलबजावणी करणार नाही. ".

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ याच्या कलम ५२-ख ची सुधारणा.

८. मुख्य अधिनियमाच्या कलम ५२-ख मधील परंतुकाऐवजी पुढील परंतुक दाखल करण्यात येईल :—

" परंतु, प्रन्यासाच्या पूर्वमंजुरीशिवाय, पन्नास लाख रुपयांपेक्षा अधिक खर्चाची संविदा अध्यक्षाकडून करण्यात येणार नाही. ".

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ याच्या कलम ५२-ग ची सुधारणा.

९. मुख्य अधिनियमाच्या कलम ५२-ग मधील,—

(१) पोट-कलम ३ मध्ये, " कलम ५२-ख मधील पोट-कलम (१) च्या परंतुकाच्या खंड (क) अन्वये " या मजकुराऐवजी, " कलम ५२-ख मधील पोट-कलम (१) च्या परंतुकान्वये " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (४) मध्ये, " कलम ५२-ख मधील पोट-कलम (१) च्या परंतुकाच्या खंड (क) मध्ये निर्धारित केल्यानुसार आपल्या अधिकारांच्या आर्थिक मर्यादेमध्ये आणि राज्य शासन उक्त परंतुकाच्या खंड (ख) मध्ये निर्दिष्ट केलेल्या प्रकरणांमध्ये " या मजकुराऐवजी, " कलम ५२-ख मधील पोट-कलम (१) च्या परंतुकान्वये निर्दिष्ट केलेल्या प्रकरणांमध्ये " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ यामध्ये शीर्षक आणि कलमे ८८-क व ८८-ख समाविष्ट करणे.

१०. मुख्य अधिनियमाच्या कलम ८८ नंतर पुढील शीर्षक व कलमे समाविष्ट करण्यात येतील :—

" प्रन्यासने करावयाची वसुली व वसुलीयोग्य रक्कम गोळा करणे

प्रन्यासाला देय असलेल्या रकमेची वसुली.

**८८-क.** (१) या अधिनियमाद्वारे किंवा तदन्वये अन्यथा स्पष्ट तरतूद केली असेल त्याव्यतिरिक्त, या अधिनियमान्वये किंवा त्यावेळी अंमलात असलेल्या इतर कोणत्याही कायद्यान्वये वसुलीयोग्य असलेली कोणतीही रक्कम देय झाली असल्यास, प्रन्यास अशी रक्कम देण्यास बांधिल असेल अशा व्यक्तीवर, वाजवी कालावधीत, देय असलेल्या रकमेचे एक देयक (बिल) बजावील.

(२) अशा प्रत्येक देयकामध्ये,—

(क) ज्या कालावधीकरिता रकमेची मागणी करण्यात आली असेल तो कालावधी, आणि

(ख) ज्याबाबत रकमेची मागणी करण्यात आली असेल अशी मालमत्ता, व्यवसाय किंवा बाब,

यांचा तपशील नमूद केलेला असेल आणि प्रदान करण्यास कसूर झाल्यास पत्करलेले दायित्व, याबाबतची नोटीस तसेच अशा मागणीविरुद्ध कलम १०८-क अन्वये अपील दाखल करण्यासंबंधीच्या हक्काची माहिती देखील देण्यात येईल.

(३) ज्या रकमेकरिता उपरोक्तप्रमाणे पाठवलेले कोणतेही देयक प्रन्यास कार्यालयात अथवा त्या संदर्भात प्रन्यासने अशी प्रदाने स्वीकारण्यास प्राधिकृत केलेल्या कोणत्याही व्यक्तीकडे ते पाठवल्याच्या दिनांकापासून पंधरा दिवसांच्या आत देण्यात आलेले नसेल अथवा त्या देयकात अंतर्भूत अशा कोणत्याही मागणीविरुद्ध कोणतेही अपील करण्यात आलेले नसेल तर, प्रन्यास उक्त रकमेचे प्रदान करण्यास जबाबदार असलेल्या व्यक्तीला विहित नमुन्यात मागणीची नोटीस पाठवण्याची व्यवस्था करील.

**८८-ख.** (१) जर, कलम ८८-क अन्वये मागणीची नोटीस बजावण्यात आलेल्या व्यक्तीने अशी मागणी नोटीस बजावल्यापासून पंधरा दिवसांच्या आत नोटिशीमध्ये मागणी केलेली रक्कम प्रदान करण्यास कसूर केली असेल किंवा त्याने ती रक्कम का भरू नये यासंबंधात अध्यक्षाचे किंवा याबाबतीत अध्यक्ष नियुक्त करील अशा अधिकाऱ्याचे समाधान होईल असे कारण दाखविले नसेल तर, शिल्लक राहिलेली रक्कम ही, महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ व त्याखाली केलेले नियम याअन्वये जमीन महसुलाची थकबाकी म्हणून वसूल केली जाण्यास पात्र असेल. विवक्षित रकमा जमीन महसुलाची थकबाकी म्हणून वसूल करणे.

१९६६ चा महा. ४१.

१९६६ चा महा. ४१.

(२) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ खालील जिल्हाधिकाऱ्याच्या अधिकारांचा, पोट-कलम (१) च्या प्रयोजनांसाठी अध्यक्षाकडून वापर करण्यात येईल :

परंतु, अध्यक्षाला, त्याने स्वाक्षरी केलेल्या लेखी आदेशाद्वारे, या पोट-कलमाखालील अधिकार, विभागीय अधिकाऱ्याच्या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेल्या प्रन्यासाच्या कोणत्याही अधिकाऱ्याकडे सोपविता येतील. ".

११. मुख्य अधिनियमाच्या कलम १०८ नंतर, पुढील प्रकरण व कलम समाविष्ट करण्यात येईल :— सन १९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक ३६ यामध्ये प्रकरण दहा क आणि कलम १०८-क समाविष्ट करणे.

## प्रकरण दहा क

## अपिले

" **१०८-क.** (१) या अधिनियमान्वये किंवा त्याखाली केलेले कोणतेही नियम किंवा विनियम याअन्वये प्रन्यासाच्या अधिकाऱ्याने दिलेल्या कोणत्याही आदेशामुळे व्यथित झालेल्या कोणत्याही व्यक्तीला, असा आदेश मिळाल्याच्या दिनांकापासून तीस दिवसांच्या आत, अशा अपिलांवर सुनावणी करण्यासाठी अध्यक्षाकडून पदनिर्देशित करण्यात आले असेल अशा प्रन्यासाच्या अधिकाऱ्याकडे किंवा जर असा अधिकारी पदनिर्देशित करण्यात आला नसेल तर, अध्यक्षाकडे, अपील करता येईल. अपिले.

(२) अध्यक्षाव्यतिरिक्त कोणत्याही अधिकाऱ्याने अपिलात दिलेला कोणताही आदेश, अध्यक्षाच्या पुनरीक्षणाधीन असेल.

(३) जर मूळ आदेश अध्यक्षाने स्वतः दिलेला असेल तर, अपील, राज्य शासनाकडे किंवा राज्य शासन निदेश देईल अशा त्याच्या अधिकाऱ्याकडे दाखल करण्यात येईल.".

## निवेदन

नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम, १९३६ (१९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड ३६) याअन्वये घटित केलेल्या नागपूर सुधार प्रन्यासाच्या कार्यक्षेत्रामध्ये नागपूर शहर क्षेत्राचा व राज्य शासन वेळोवेळी अधिसूचित करील अशा इतर बाहेरील क्षेत्राचा समावेश होतो.

२. नागपूर महानगर प्रदेशाचे विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून प्रन्यासावरील नवीन व वाढत्या जबाबदाऱ्यांचा विचार करता प्रदीर्घ काळापासून सुधारणा करण्यात न आलेल्या उक्त अधिनियमात सुधारणा करणे इष्ट वाटते.

३. प्रस्तावित सुधारणांची ठळक वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे आहेत :—

(एक) अधिनियमाच्या अंमलबजावणीमध्ये, महसुली अधिकाऱ्यांच्या प्रभावी सहभागाची सुनिश्चिती करण्यासाठी, प्रन्यासाचा पदसिद्ध विश्वस्त म्हणून नागपूर जिल्ह्याच्या जिल्हाधिकाऱ्यास किंवा अपर जिल्हाधिकाऱ्यास नामनिर्देशित करण्याचा अधिकार शासनाकडे घेण्यात आला आहे.

(दोन) प्रन्यासाच्या प्रभावी प्रशासनाची सुनिश्चिती करण्यासाठी व त्याच्या हिताचे संरक्षण करण्यासाठी आणि त्याच्या अधिकाराच्या गैरवापरास आळा घालण्यासाठी,—

(क) प्रन्यासाच्या आर्थिक बाबींसंबंधी, कामकाज चालविण्याबाबत आणि कारभाराबाबत, प्रन्यासाला निदेश किंवा सूचना देण्याचा ;

(ख) ज्यामुळे अधिनियमाद्वारे किंवा त्याअन्वये प्रदान केलेल्या अधिकारांचा अवाजवी वापर होईल किंवा त्यांचे उल्लंघन होईल किंवा प्रन्यासाच्या निधींचा दुरुपयोग अथवा गैरवापर किंवा अपव्यय होण्याची शक्यता असेल किंवा जो प्रन्यासाच्या वित्तीय हिताच्या विरुद्ध किंवा व्यापक जनहिताच्या विरुद्ध किंवा राज्य शासनाच्या धोरणाच्या विरुद्ध असेल, असा प्रन्यासाचा किंवा त्याच्या कोणत्याही प्राधिकाऱ्याचा किंवा अधिकाऱ्याचा कोणताही निर्णय किंवा आदेश किंवा त्याची कोणतीही कृती याचे पुनर्विलोकन करण्याचा ;

(ग) प्रन्यासाच्या आस्थापनेवर निर्माण केलेल्या पदावर नियुक्ती करण्यासाठी, शासनाने योग्य अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्ती करण्याकरिता तरतूद करण्याचा,

अधिकार शासनाकडे घेण्यात आला आहे.

(तीन) अध्यक्षाच्या वित्तीय अधिकारांमध्ये वाढ करणे आणि सहायक अभियंत्याच्या दर्जाशी समकक्ष असलेल्या किंवा त्याच्यापेक्षा कमी दर्जा असलेल्या प्रन्यासाच्या अधिकाऱ्यांच्या पदांच्या संबंधात नियुक्ती, पदोन्नती व शिस्तभंगाची कारवाई या बाबींच्या संबंधात त्याला अधिकार प्रदान करणे.

(चार) या अधिनियमान्वये, प्रन्यासाच्या अधिकाऱ्यांनी आणि अध्यक्षाने दिलेल्या आदेशाविरुद्ध अपील करण्यासाठी तरतूद करणे.

(पाच) प्रन्यासाला देय असलेल्या रकमांची जमीन महसुलाची थकबाकी असल्याप्रमाणे वसुली करण्याकरिता, प्रन्यासाला अधिकार प्रदान करणे.

४. राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही आणि उपरोक्त प्रयोजनांकरिता, नागपूर सुधार प्रन्यास अधिनियम, १९३६ (१९३६ चा मध्य प्रांत व वऱ्हाड ३६) यामध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी, महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तत्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे, म्हणून, हा अध्यादेश प्रख्यापित करण्यात येत आहे.

मुंबई,
दिनांक २ जुलै २०११.

**के. शंकरनारायणन्,**
महाराष्ट्राचे राज्यपाल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**मनु कुमार श्रीवास्तव,**
शासनाचे प्रधान सचिव.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.

2011072115585601

RNI No. MAHENG/2009/35528




# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग आठ

वर्ष ३, अंक २२] सोमवार, जुलै ४, २०११/आषाढ १३, शके १९३३ [पृष्ठे ८, किंमत : रुपये १४.००

असाधारण क्रमांक ६८

प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधि व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Nagpur Improvement Trust (Amendment) Ordinance, 2011 (Mah. Ord. XVII of 2011), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,

Secretary to Government,
Law and Judiciary Department.

(Translation in English of the Nagpur Improvement Trust (Amendment) Ordinance, 2011 (Mah. Ord. XVII of 2011), published under the authority of the Governor).

---

**URBAN DEVELOPMENT DEPARTMENT**

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 4th July 2011.

**MAHARASHTRA ORDINANCE No. XVII OF 2011.**

*AN ORDINANCE*

*further to amend the Nagpur Improvement Trust Act, 1936.*

WHEREAS both Houses of the State Legislature are not in session ;

AND WHEREAS the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Nagpur Improvement Trust Act, 1936, for the purposes hereinafter appearing ;

C. P. and Berar XXXVI of 1936.

NOW, THEREFORE, in exercise of the powers conferred by clause (*1*) of article 213 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to promulgate the following Ordinance, namely :—

Short title and commencement.

1. (*1*) This Ordinance may be called the Nagpur Improvement Trust (Amendment) Ordinance, 2011.

(*2*) It shall come into force at once.

Amendment of section 4 of C. P. and Berar XXXVI of 1936.

2. In section 4 of the Nagpur Improvement Trust Act, 1936 (hereinafter referred to as "the principal Act"),— C. P. and Berar XXXVI of 1936.

(*1*) in sub-section (*1*),—

(*a*) for the words "nine Trustees" the words "ten Trustees" shall be substituted ;

(*b*) after clause (*b*), the following clause shall be inserted, namely :—

"(*ba*) the Collector or Additional Collector of Nagpur District, to be nominated by the State Government ;" ;

(*2*) in sub-section (*3*), for the words, brackets and letter "or clause (*c*)" the words, brackets and letters ", clause (*ba*) or clause (*c*)" shall be substituted.

Amendment of section 7 of C. P. and Berar XXXVI of 1936.

3. In section 7 of the principal Act, in sub-section (*1*), for the words, brackets and letter "or clause (*c*)" the words, brackets and letters ", clause (*ba*) or clause (*c*)" shall be substituted.

Amendment of section 21-A of C. P. and Berar XXXVI of 1936.

4. In section 21-A of the principal Act, in sub-section (*2*), the proviso shall be deleted.

Amendment of section 22 of C. P. and Berar XXXVI of 1936.

5. Section 22 of the principal Act shall be re-numbered as sub-section (*1*) thereof ; and

(*1*) in sub-section (*1*) as so re-numbered,—

(*a*) in clause (*a*), for the words "whose monthly salary does not exceed one hundred and fifty rupees" the words "whose Grade Pay in the pay structure is equivalent to or lower than that of an Assistant Engineer" shall be substituted ;

(*b*) in the proviso, for the words "in receipt of a monthly salary exceeding fifty rupees" the words "in receipt of Grade Pay in the pay structure less than that is payable to an Assistant Engineer" shall be substituted ;

(2) after sub-section (*1*), as so re-numbered, the following sub-section shall be added, namely :—

"(*2*) Notwithstanding anything contained in this section, it shall be lawful for the State Government by an order, to depute any officer in the service of the State Government for appointment on the establishment of the Trust, who shall be so appointed by the Trust. The terms and conditions of service and the term of appointment of such deputed officer shall be such, as may be specified by the State Government in the order.".

**6.** In section 24 of the principal Act, in sub-section (2), for the words " and also to control and revision by the Chairman " the words " and also to control and *suo motu* revision by the Chairman " shall be substituted. Amendment of section 24 of C. P. and Berar XXXVI of 1936.

**7.** After section 24-C of the principal Act, the following sections shall be inserted, namely :— Insertion of sections 24-D and 24-E in C. P. and Berar XXXVI of 1936.

"**24-D.** The State Government may, from time to time, issue such directions or instructions as it may think fit in regard to finance and conduct of business and affairs of the Trust and the Trust shall be bound to follow and act upon these directions or instructions : Power of State Government to issue directions or instructions.

Provided that, the State Government shall, before issuing any directions or instructions, give an opportunity to the Trust to make representation within fifteen days as to why such directions or instructions shall not be issued. If the Trust fails to represent within fifteen days or, after having represented, the State Government on considering the representation, is of the opinion that issuing of such directions or instructions is necessary ; the State Government may issue the same.

**24-E.** (*1*) If the State Government on a reference made to it by the Chairman, or *suo motu*, is satisfied that any resolution or order or any act of the Trust or of any of its authorities or officers is in contravention of, or, in excess of, the powers conferred by or under this Act or any other law for the time being in force, or rules, regulations or bye-laws made thereunder, or is likely to lead to abuse or misuse of, or cause waste of the Trust Fund or is against the financial interests of the Trust or against the interests of public or against the policy of the State Government, the State Government may, give an appropriate order in writing, in that behalf. A copy of such order shall be sent forthwith by the State Government to the Chairman : Power of State Government to suspend any resolution, etc. of Trust.

Provided that, the State Government shall, before issuing any such order, give an opportunity to the Trust to make representation within fifteen days as to why such order shall not be issued. If the Trust fails to represent within fifteen days or, after having represented, the State Government, on considering the representation, is of the opinion that issuing of such order is necessary; the State Government may issue the same.

(2) On receipt of the order sent under sub-section (*1*), the Trust shall be bound to follow and act upon such order.

(3) No resolution or order or act which has been referred to by the Chairman under sub-section (*1*) or *suo motu* cognizance of which has been taken under that sub-section shall be implemented by the Trust or any of its authorities or officers, until decision of the State Government in accordance with the provisions of sub-section (*1*) is communicated to the Trust.".

Amendment of section 52-B of C. P. and Berar XXXVI of 1936.

**8.** In section 52-B of the principal Act, in sub-section (*1*), for the proviso, the following proviso shall be substituted, namely :—

"Provided that, a contract involving an expenditure exceeding fifty lakh rupees shall not be made by the Chairman without the previous sanction of the Trust.".

Amendment of section 52-C of C. P. and Berar XXXVI of 1936.

**9.** In section 52-C of the principal Act,—

(*1*) in sub-section (*3*), for the words, brackets, figures and letters "under clause (*a*) of the proviso to sub-section (*1*) of section 52-B" the words, brackets, figures and letter "under the proviso to sub-section (*1*) of section 52-B" shall be substituted ;

(*2*) in sub-section (*4*), for the words, brackets, figures and letters "in clause (*a*) of the proviso to sub-section (*1*) of section 52-B and the State Government in the cases referred to in clause (*b*) of the said proviso" the words, brackets, figures and letter "under the proviso to sub-section (*1*) of section 52-B" shall be substituted.

Insertion of heading and sections 88-A and 88-B in C. P. and Berar XXXVI of 1936.

**10.** After section 88 of the principal Act, the following heading and sections shall be inserted, namely :—

## " RECOVERY AND COLLECTION OF AMOUNT RECOVERABLE BY TRUST

Recovery of amount due to Trust.

**88-A.** (*1*) Save as otherwise expressly provided by or under this Act, when any amount which is recoverable under this Act or any other law for the time being in force, has become due, the Trust shall, within a reasonable time, cause to be presented to the person liable for the payment thereof, a bill for the sum claimed as due.

(2) Every such bill shall specify--

(*a*) the period for which, and

(*b*) the details of the property, occupation or thing in respect of which,

the sum is claimed, and shall also give notice of the liability incurred in default of payment, so also information regarding right to prefer an appeal under section 108-A against such claim.

(*3*) If the sum for which any bill has been presented, as aforesaid is not paid into the Trust office, or to a person authorized by the Trust in that behalf to receive such payments, within fifteen days from the presentation thereof or if no appeal against any claim included in a bill is made, the Trust shall cause to be served upon the person liable for the payment of the said sum a notice of demand in the prescribed form.

Certain sums to be recoverable as an arrears of land revenue.

**88-B.** (*1*) Notwithstanding anything contained in any other provision of this Act, if the person upon whom the notice of demand has been served under section 88-A fails to pay, within fifteen days from the service of such notice of demand, the sum demanded in the notice, or to show cause to the satisfaction of the Chairman or such officer as the Chairman may appoint in this behalf, why he should not pay the same, the outstanding amount shall be liable to be recovered as an arrears of land revenue under the Maharashtra Land Revenue Code, 1966, and the rules made thereunder. Mah. XLI of 1966.

(*2*) The powers of Collector under the Maharashtra Land Revenue Code, 1966 shall be exercised by the Chairman for the purposes of sub-section (*1*) : Mah. XLI of 1966.

Provided that, the Chairman may, by an order in writing, signed by him, delegate the powers under this sub-section to any officer of the Trust not below the rank of Divisional Officer.".

Insertion of Chapter XA and section 108-A in C. P. and Berar XXXVI of 1936.

**11.** After section 108 of the principal Act, the following Chapter and section shall be inserted, namely :—

"CHAPTER XA

APPEALS

Appeals.

**108-A.** (*1*) Any person aggrieved by an order of an Officer of the Trust passed under this Act or under any rule or regulation made thereunder, may, within a period of thirty days from the date of receipt of such order, appeal to such Officer who has been designated by the Chairman to hear such appeals, or if no such Officer has been designated, to the Chairman.

(*2*) Any order passed in appeal by any such Officer, other than the Chairman, shall be subject to revision by the Chairman.

(*3*) If the original order has been passed by the Chairman himself, the appeal shall lie to the State Government or any of its officer as it may direct. ".

## STATEMENT

The Nagpur Improvement Trust constituted under the Nagpur Improvement Trust Act, 1936 (C. P. and Berar XXXVI of 1936) covers the area of the Nagpur City and such other outside area, as notified by the State Government, from time to time.

2. In the context of new and emerging responsibilities of the Trust as the Special Planning Authority of the Nagpur Metropolitan Region, it is considered expedient to amend the said Act, which has not been amended since long.

3. Salient features of the proposed amendments are as follows :—

(*i*) to ensure effective participation of revenue officers in implementation of the Act, power is taken to the State Government to nominate the Collector or Additional Collector of Nagpur District, as an *ex-officio* trustee of the Trust ;

(*ii*) to ensure effective administration and to protect interests of the Trust and to prevent any misuse of authority, power is taken to the State Government ,—

(*a*) to give directions or instructions to the Trust in the matters relating to finance, conduct of business and affairs of the Trust ;

(*b*) to review any resolution or order or any act of the Trust or of any of its authorities or officers, which is in contravention of, or in excess of, the powers conferred by or under the Act, or is likely to abuse or misuse of, or cause waste of the Trust Fund or against the financial interests of the Trust or against the interests of the public or against the policy of the State Government ;

(*c*) to provide for deputation of suitable officers by the Government for appointment on a post created on the establishment of the Trust ;

(*iii*) to enhance the financial powers of the Chairman and to confer upon him powers in respect of the matters of appointment, promotion and disciplinary action in respect of the posts of the Trust Officers equivalent to or below the rank of the Assistant Engineer ;

(*iv*) to provide for appeal against the order passed by the Trust Officers and Chairman under the Act ;

(*v*) to empower the Trust to recover the amounts due to the Trust as arrears of land revenue.

4. As both Houses of the State Legislature are not in session and the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Nagpur Improvement Trust Act, 1936 (C. P. and Berar XXXVI of 1936), for the purposes aforesaid, this Ordinance is promulgated.

Mumbai,
Dated the 2nd July 2011.

K. SANKARANARAYANAN,
Governor of Maharashtra.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

MANU KUMAR SRIVASTAVA,
Principal Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.